**जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी यांना देण्यात आलेल्या विषयांमध्ये सुधारणा**

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
परिपत्रक क्रमांक संकीर्ण ०२/२०११/प्र.क्र.१३/ई-१,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
**दिनांक : २९ जुलै, २०११**

**वाचा :** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक एस-१४/३६१३/प्र.क्र.२०९(२)/ई-३, दि.२८.१.१९९२
२) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक एस-१४/३६१३/प्र.क्र.२०९(२)/ई-३, दि.३०.४.१९९२

**परिपत्रक :-**

उपरोक्त क्रमांक १ येथील नमूद शासन निर्णयानुसार प्रत्येक जिल्ह्यासाठी अपर जिल्हाधिकाऱ्यांचे स्वतंत्र पद निर्माण करण्यात आल्याने जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी यांच्यामध्ये कामाची वाटणी करण्याबाबत उपरोक्त क्रमांक २ अन्वये दि.३०.४.१९९२ रोजी आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी यांच्या विहित केलेल्या विषयवाटपानुसार सध्या "अन्न, नागरी पुरवठा विषयक बाबी" हा विषय अपर जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात आलेला आहे. तथापि, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांची अधिक परिणामकारक अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने त्या विभागाचे कामकाज अपर जिल्हाधिकाऱ्यांऐवजी जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या अनुषंगाने शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक एस-१४/३६१३/प्र.क्र.२०९(२)/ई-३, दि.३०.४.१९९२ मधील प्रपत्र **"ब"** मधील अनुक्रमांक १ येथे नमूद केलेला **"अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विषयक बाबी"** हा विषय **अपर जिल्हाधिकारी याच्याऐवजी जिल्हाधिकारी** यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. या व्यतिरिक्त दि.३०.४.१९९२ मधील जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी यांच्या कामकाजाच्या उर्वरित विषयवाटपामध्ये कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

२. तसेच, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विषयक बाबींच्या कामाकाजासंदर्भात **जिल्हा पुरवठा अधिकारी** हे **जिल्हाधिकारी यांच्या थेट नियंत्रणाखाली** राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०७२९१११२३१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

***सही/-***

**(राजेंद्र सुर्वे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,

(कृ.मा.प.)

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
प्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
महालेखापाल-१/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व अपर जिल्हाधिकारी,
निवडनस्ती (ई-१ कार्यासन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई